अधिक्षक कृषि अधिकारी संवर्गातील
अधिकाऱ्यांच्या बदल्या.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आकृवि १०१८/प्र.क्र. १५४ /१५अे**
**मंत्रालय विस्तार इमारत,**
**मंत्रालय, मुंबई -३२.**
**तारीख: ०८ जून, २०१८.**

वाचा:- १.कृषि व पदुम विभाग, शासन आदेश क्र. आकृवि ०६१७/प्र.क्र.२०१/१५-अे, दि. ०१.०२.२०१८
२.कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. आकृवि १०१८/प्र.क्र.१५४/१५-अे, दि. ०४.०६.२०१८

## शासन निर्णय :-

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व ४ (५) मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयातील श्री. जगताप व श्री. बऱ्हाटे यांचे पदस्थापनेचे आदेश रद्द करून विभागातील अधिक्षक कृषि अधिकारी ( वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० ग्रेड वेतन - ६६०० ) संवर्गातील खालील अधिका-यांना प्रशासकीय कारणास्तव खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-याचे नांव व पदनाम | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| १ | श्री. व्ही. एस. सोनवणे, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, जळगाव | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, धुळे (श्री. जगताप यांचे संदर्भाधीन क्र. २ चे आदेश रद्द करून) |
| २ | श्री. पाटील उदय मोतीराम, प्राचार्य, कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था नागपूर (रामेती) | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, चंद्रपूर (श्री. बऱ्हाटे यांचे संदर्भाधीन क्र. २ चे आदेश रद्द करून) |

२. श्री. जगताप व श्री. बऱ्हाटे यांच्या पदस्थापनेचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील.

३. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरिता कोणत्याही प्रकारची रजा मंजूर न करता तात्काळ कार्यमूक्त करण्यात यावे व बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर व्हावे. बदली झालेले अधिकारी हे रूजू/कार्यमूक्त झाल्याबाबतचा अनुपालन अहवाल, त्यांना रूजू करून घेतलेल्या/कार्यमूक्त केलेल्या अधिकाऱ्यांने तात्काळ आयुक्त (कृषि) यांना सादर करावा.

४. आयुक्त (कृषि ), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६०८१६५९२९६१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2018.06.08 20:15:18 +05'30'

**( सु.सं. धपाटे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) ½, महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
३. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
४. संचालक, वसंतराव नाईक कृषि व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था, (वनामती) नागपूर.
५. सर्व सह सचिव/उप सचिव ( कृषि ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. संबंधित विभागीय आयुक्त ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
७. सर्व विभागीय कृषि सह संचालक/जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
८. कृषि सह संचालक, (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे
९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
१०. सर्व संबंधित अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
११. निवड नस्ती /१५अे

**प्रत,**

१२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
१३. मा.राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१४. मा. अ.मु.स. ( कृषि ) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.